(RKVY २०१७-१८)

**राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत (RKVY) राज्यातील बीज परिक्षण प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे ही योजना सन २०१७-१८ मध्ये राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : बिप्रय - १२१७/प्र.क्र.११०/ १अे**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.**
**दिनांक : ०८ ऑगस्ट, २०१७**

**वाचा :-** कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे शासन पत्र क्र.RKV-0317/C.R.14/RKVY Cell, Dated 9th June,2017.

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत दिनांक २५ मे,२०१७ रोजी झालेल्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या बैठकीत, राज्यातील बियाणे तपासणी प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे, कीडनाशके उर्वरित अंश तपासणी प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे, खत तपासणी प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे व किटकनाशक तपासणी प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे या प्रस्तावांचा समावेश असलेला रूपये ४३५ लक्ष रकमेचा प्रकल्प चालू सन २०१७-१८ मध्ये राबविण्यासाठी मंजूर करण्यात आलेला आहे. सदर प्रकल्पांतर्गत बियाणे तपासणी प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे या साठी रूपये १६० लक्ष रकमेच्या प्रस्तावासाठी प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यात गुणवत्ता नियंत्रणांतर्गत पुणे, परभणी व नागपूर येथे एकूण तीन बीज परिक्षण प्रयोगशाळा कार्यरत आहेत. या प्रयोगशाळांचे अंतर्गत उच्च दर्जाचा अंकुरण कागद व वॅक्स कागद खरेदी करणे, प्रयोगशाळेची क्षमता वापरात आणणे करीता कंत्राटी पद्धतीने तांत्रिक मनुष्यबळ आऊट सोर्सिंगद्वारे उपलब्ध करणे, गौण बांधकाम, वॉटर प्रुफिंग, अंकुरण कक्षाचे नुतनीकरण व इलेक्ट्रीफिकेशन, एन.ए.बी.एल. मानांकन कायम राखणे / आंतरराष्ट्रीय बीज परिक्षण संस्थेचे इस्टा सभासदत्व प्राप्त करणे, तसेच, विश्लेषकांना विश्लेषणाबाबतचे राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावरील अद्ययावत प्रशिक्षण देणे, विशेष सुट्टे भागाद्वारे उपकरणांची क्षमतावृद्धी करणे, गौण उपकरणे खरेदी करणे, प्रमाणित संदर्भिय रसायने, प्रायमर्स, व्हॅलीडेशन परफॉरमन्स, कॅलीब्रेशन, रेफरन्स बुक, एएमसी, सीएमसी आणि देखभाल इ. Grow Out Test करणेसाठी, कुंपणासह ग्लास हाऊस / Poly House चे बांधकाम करणे, नवीन तंत्रज्ञानाची अद्ययावत उपकरणे प्रयोगशाळांना उपलब्ध करून देणे, प्रशासकीय खर्च १ टक्का, इत्यादी प्रयोजनाकरीता सन २०१७-१८ मध्ये रूपये १६०.०० लाख इतक्या रकमेच्या खर्चासह बीज परीक्षण प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे हा प्रकल्प राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर प्रकल्पाचे भौतिक व आर्थिक लक्ष खालीलप्रमाणे आहे.

**बीज परीक्षण प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे.**

| अ.क्र. | बाब | भौतिक | आर्थिक (रूपये लाख) |
|---|---|---|---|
| १ | उच्च दर्जाचा अंकुरण कागद व वॅक्स कागद खरेदी. | प्रयोगशाळा ३ | १२.०० |
| २ | प्रयोगशाळेची क्षमता वापरात आणणे करीता कंत्राटी पद्धतीने तांत्रिक मनुष्यबळ आऊट सोर्सिंगद्वारे उपलब्ध करणे. | प्रयोगशाळा ३ | ९.०० |
| ३ | गौण बांधकाम, वॉटर प्रुफींग, अंकुरण कक्षाचे नुतनीकरण व इलेक्ट्रीफिकेशन. | प्रयोगशाळा ३ | २१.०० |
| ४ | इस्टा व एन.ए.बी.एल. नोंदणी शुल्क. | प्रयोगशाळा ३ | १५.०० |
| ५ | विशेष सुट्टे भागाद्वारे उपकरणांची क्षमतावृद्धी करणे, गौण उपकरणे खरेदी करणे, प्रमाणित संदर्भिय रसायने, प्रायमर्स, व्हॅलीडेशन परफॉरमन्स, कॅलीब्रशेन, रेफरन्स बुक, एएमसी, सीएमसी आणि देखभाल इ. | प्रयोगशाळा ३ | १७.०० |
| ६ | Grow Out Test करणेसाठी कुंपणासह ग्लास हाऊस / Poly House चे बांधकाम करणे. | प्रयोगशाळा ३ | ६०.०० |
| ७ | प्रशासकीय खर्च १ टक्का. | प्रयोगशाळा ३ | १.६० |
| ८ | उपकरणे खरेदी (आयुक्तालय स्तर ). | प्रयोगशाळा ३ | २४.४० |
| | **एकूण** | | **१६०.००** |

३. प्रस्तुत प्रकरणी उक्त प्रकल्प राबविण्याकरिता निधी वितरणाची कार्यवाही राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडून करण्यात येईल.

४. वरील निधी खर्च करण्यास संचालक (नि. व गु.नि.) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना सक्षम प्राधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनानुसार या योजनेचा आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल विहित मुदतीत केंद्र शासनास तसेच राज्य शासनास सादर होईल याची दक्षता घेण्यात यावी. तसेच झालेल्या खर्चाचे विनियोजन प्रमाणपत्रही वित्तीय वर्ष संपल्यावर एक महिन्यात शासनास सादर करण्यात यावे.

५. सदर निधी खर्च करताना विहित कार्यपद्धती अनुसरून सर्व वित्तीय कायदे / टेंडर नियमावली व नियमांचे / प्रक्रीयेचे / वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत / P.W.D. / Manual चे अधिन राहून / C.V.C. तत्वानुसार / C.A.G. च्या निर्देशानुसार / प्रचलीत शासन निर्णय / नियम / परिपत्रक तरतूदींनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अंमलबजावणी यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम / अधिकाराचा भंग होणार नाही याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रीय कार्यालयाची

राहील. तसेच वित्त विभागाच्या दिनांक १८.४.२०१७ व ३०.६.२०१७ च्या परिपत्रकातील अटींची पूर्तता करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharshtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०८०८१११७०२२००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Umesh Narayan Chandiwade

Digitally signed by Umesh Narayan Chandiwade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, cn=Umesh Narayan Chandiwade
Date: 2017.08.08 11:09:58 +05'30'

**(उमेश चांदिवडे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे.
५) महालेखापाल - १/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
६) सर्व कृषि संचालक, महाराष्ट्र, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे.
७) सर्व विभागीय कृषि सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे.
८) संचालक (विस्तार व प्रशिक्षण ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९) अवर सचिव,राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) सर्व विभागीय कृषि सहसंचालक.
११) जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, पुणे / परभणी / नागपूर.
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे / परभणी / नागपूर.
१३) कक्ष अधिकारी (कार्यासन २-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) कक्ष अधिकारी (कार्यासन व्यय-१/ अर्थसंकल्प -१३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) कक्ष अधिकारी (कार्यासन १४३१),नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) निवड नस्ती (कार्यासन १अे), कृषि व पुदम विभाग, मंत्रालय, मुंबई.